**नवी मुंबई येथील कोकण भवन इमारतीमध्ये आग सुरक्षा उपाय योजना करण्यासाठी येणा-या रुपये १,५३,८३,८४०/- एवढ्या रकमेच्या अंदाजपत्रकास व नकाशास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१३/प्र.क्र.४/ई-८,**

३२ वा मजला, सेंटर -१ इमारत,जागतिक व्यापार केंद्र,

कफ परेड, कुलाबा, मुंबई-४०० ००५.

तारीख: ०९/१२/२०१४

**वाचा:-**

विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई यांचे पत्र क्र. साशा/कक्ष-१/इमारत/सुरक्षा ऑडिट/निधी/२०१२, दि. १३/०९/२०१२.

**शासन निर्णय:-**

नवी मुंबई येथील कोकण भवन इमारतीमध्ये आग सुरक्षा उपाय योजना करण्यासाठी येणा-या रुपये १,५३,८३,८४०/- ( अक्षरी रुपये एक कोटी त्रेपन्न लक्ष त्र्याऐंशी हजार आठशे चाळीस फक्त ) एवढ्या रकमेच्या अंदाजपत्रकास व नकाशास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सार्वजनिक बांधकाम विभागाकडून अंदाजपत्रकाची सर्वसाधारण तपासणी करता खालील बाबी आढळून आल्या आहेत.-

१) सदर कामाची अंदाजपत्रके उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम विद्युत विभाग, ठाणे यांनी तयार केले आहे. व सक्षम अधिकारी म्हणून कार्यकारी अभियंता, सा.बां. विद्युत विभाग, ठाणे, यांनी साक्षांकित केले आहे.

२) अंदाजपत्रके सन २०११-१२ च्या जिल्हा दरसूचीवर आधारित आहे. दरसूचीबाह्य बाबींचे दर प्राप्त झालेल्या कोटेशनवर आधारित आहेत.

३) अंदाजपत्रकात ४ टक्के आकस्मिक खर्चाची तरतुद करण्यात आली आहे.

४) काम सुरु करण्यापूर्वी सदर अंदाजपत्रक सा. बां. विद्युत विभागाचे संबंधित अधिक्षक अभियंता व मुख्य अभियंता यांचेकडू साक्षांकित करुन घ्यावे.

५) सदरील काम जर अर्थसंकल्पाव्यतिरीक्त करावयाचे झाल्यास त्यात ४ टक्के सेंटेज

चार्जेसची तरतुद मिळविण्यात यावी.

३. प्रस्तुत कामाच्या अंदाजपत्रकात वरील प्रमाणे सुधारणा व दुरुस्ती करुन नवी मुंबई येथील कोकण भवन इमारतीमध्ये आग सुरक्षा उपाय योजना करण्यासाठी येणा-या रुपये १,५३,८३,८४०/- ( अक्षरी रुपये एक कोटी त्रेपन्न लक्ष त्र्याऐंशी हजार आठशे चाळीस फक्त ) इतक्या रक्कमेस वरील परिच्छेद क्रमांक २ मधील अटींच्या अधीन राहून अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यास सार्वजनिक बांधकाम विभागाची सहमती आहे.

४. प्रस्तावित बांधकामावरील खर्च "४०५९-सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च- ०१ कार्यालयीन इमारती-१०१ बांधकाम पंचवार्षिक योजनाअंतर्गत योजना जिल्हा प्रशासन - मागणी क्रमांक एच-८" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सार्वजनिक बांधकाम विभागास उक्त लेखाशिर्षाखाली मंजूर केलेल्या अनुदानातुन भागविण्यात यावा. मात्र सदरच्या खर्चासाठी अंदाजपत्रकामध्ये तरतुद केल्याशिवाय बांधकामास सुरुवात करु नये.

५. हे आदेश सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सहमतीने तसेच शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक वि.अ.प्र./१००८/प्रक्र-७०/२००८/विनियम, दिनांक १५/५/२००९ मधील भाग- पहिला, उपविभाग- पाच मधील अनुक्रमांक १ नियम क्र. १३४ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या शक्तीचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१२०८१४१५४३२३१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Chandrakant Nivrutti Padale

Digitally signed by Chandrakant Nivrutti Padale
DN: CN = Chandrakant Nivrutti Padale, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST
Date: 2014.12.09 12:43:01 +05'30'

**(चं. नि. पाडळे)**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई.

२. प्रधान लेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
३. महालेखापाल (लेखा परिक्षा), मुंबई.
४. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा- ठाणे.
५. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-३), महसूल, मुंबई-३२.
६. नियोजन विभाग, कार्यासन-१४७५, मंत्रालय, मुंबई-३२.
७. वित्त विभाग, व्यय-९ / विनियम, मंत्रालय, मुंबई-३२.
८. निवड नस्ती ई-८, महसूल व वन विभाग, कफ परेड, मुंबई-०५.